**उस्मानाबाद जिल्हा कारागृहाचे मुख्य संरक्षण भिंतीला बाहेरुन भिंतीलगत सिमेंट कॉंक्रीट नवीन रस्ता करणे या कामासाठी येणाऱ्या खर्चाच्या अंदाजपत्रकास प्रशासकीय मान्यता देणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**गृह विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः जेएलएम-१११६/प्र.क्र.२८५/तुरुंग-२,**
२रा मजला (मुख्य), हुतात्मा राजगुरु चौक,
मादाम कामा मार्ग, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक: २० एप्रिल, २०१७.

वाचा

अपर पोलीस महासंचालक व कारागृह महानिरीक्षक, महाराष्ट्र राज्य, पुणे यांचे पत्र क्र. बीएलडी/उजिका/अंतर्गत रस्ता/१०७५८/कक्ष-६(३), दिनांक १७.११.२०१६.

प्रस्तावना

उस्मानाबाद जिल्हा कारागृहाचे मुख्य संरक्षण भिंतीला बाहेरुन भिंतीलगत सिमेंट कॉंक्रीट नवीन रस्ता करणेकरीता अपर पोलीस महासंचालक व कारागृह महानिरीक्षक, महाराष्ट्र राज्य, पुणे यांनी शासनाच्या प्रशासकीय मान्यतेसाठी प्रस्ताव सादर केला आहे.याकरीता उपविभागीय अभियंता, सार्वजनिक बांधकाम उपविभाग क्र.१ , उस्मानाबाद यांनी रुपये २४.६७ लक्ष इतक्या खर्चाचे कार्यकारी अभियंता सार्वजनिक बांधकाम विभाग, उस्मानाबाद यांनी तपासून व साक्षांकीत केलेली अंदाजपत्रके सादर केली त्यास अनुसरुन याद्वारे शासन खालीलप्रमाणे निर्णय घेत आहे.

शासन निर्णय

उस्मानाबाद जिल्हा कारागृहाचे मुख्य संरक्षण भिंतीला बाहेरुन भिंतीलगत सिमेंट कॉंक्रीट नवीन रस्ता करणेकरीता छाननीअंती एकूण रुपये २४.२६ लक्ष (रुपये चोवीस लक्ष सव्वीस हजार फक्त) इतक्या अंदाजपत्रकास शासन प्रशासकीय मान्यता देत आहे.

२. सदर सविस्तर अंदाजपत्रक सन २०१५-१६ च्या दरसूचीवर आधारित आहे.

३. अंदाजपत्रकात आकस्मिक खर्च ४ टक्के रकमेची तरतूद करण्यात आली आहे.

सदर अंदाजपत्रकावर अधीक्षक अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग, उस्मानाबाद यांचे साक्षांकन करुन घेण्यात यावे तसेच गृह विभागाच्या वतीने सदर अंदाजपत्रक सक्षम अधिकाऱ्याने साक्षांकित करणे आवश्यक असल्याने अपर पोलीस महासंचालक व महानिरीक्षक, कारागृह व सुधारसेवा यांना या प्रकरणी साक्षांकन करण्यासाठी प्राधिकृत करण्यात येत आहे.

४. यासाठी होणारा खर्च मागणी क्र.एच-८, ४०५९-सार्वजनिक बांधकामावरील भांडवली खर्च, १०१ बांधकाम, (००) (०) तुरुंग, पंचवार्षिक योजना या लेखाशीर्षाखाली उपलब्ध होणाऱ्या मंजूर तरतुदीतून भागविण्यात यावा.निधी अर्थसंकल्पीत झाल्यानंतर प्रत्यक्ष कामकाजास सुरवात करण्यात यावी.

५. हा शासन निर्णय सार्वजनिक बांधकाम विभागाच्या सहमतीने व वित्त विभाग शासन निर्णय क्र. विअप्र २०१३/प्र.क्र.३०/२०१३/विनियम भाग २, दि.१७ एप्रिल,२०१५ अन्वये वित्तीय अधिकार नियम पुस्तिका १९७८, भाग-पहिला, उप विभाग-पाच,अनुक्रमांक-५, नियम १३४ अन्वये प्रशासनिक विभागांना प्रदान करण्यात आलेल्या अधिकारास अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१७०४२०१२२८०१२२२९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Prabhakar Atmaram Sankhe

Digitally signed by Prabhakar Atmaram Sankhe
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Home Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=16ca9b273a3e790c4aab4c479015f44d506ae481c2dc55f48d889691ffa9939a, cn=Prabhakar Atmaram Sankhe
Date: 2017.04.20 12:30:17 +05'30'

**( प्रभाकर संखे )**
**कार्यासन अधिकारी, गृह विभाग**

**प्रत,**

१. अपर पोलीस महासंचालक व पोलीस महानिरिक्षक (कारागृह),महाराष्ट्र राज्य,पुणे,
२. कारागृह उपमहानिरीक्षक (मुख्यालय),महाराष्ट्र राज्य,पुणे,
३. कारागृह उपमहानिरीक्षक (मध्य विभाग), औरंगाबाद,
४. अधीक्षक, उस्मानाबाद जिल्हा कारागृह, उस्मानाबाद.
५. महालेखापाल, महाराष्ट्र-२ (लेखा व अनुज्ञेयता),महाराष्ट्र राज्य, नागपूर,
६. महालेखापाल, महाराष्ट्र-२ (लेखा परिक्षा),महाराष्ट्र राज्य, नागपूर,
७. कोषागार अधिकारी, उस्मानाबाद,
८. कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम उपविभाग क्र.१, उस्मानाबाद,
९. कार्यासन अधिकारी (इमारती-२) सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय,मुंबई-३२,
१०. अवर सचिव (बीयुडी-१), गृह विभाग, मंत्रालय, मुंबई ३२.
११. निवडनस्ती, (तुरुंग-२)